**चंद्रपूर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) व उप अभियंता (यांत्रिकी / विद्युत) या पदांवर पदोन्नतीस मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- चंमपा-१४२४/प्र.क्र.११६ /नवि-२६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३० एप्रिल, २०२५.

**संदर्भ :-** (१) आयुक्त तथा प्रशासक, चंद्रपूर महानगरपालिका, चंद्रपूर यांचे पत्र क्र. चंशमनपा/साप्रआ/२०२४/९२०,९२१,९२२, दि. २१ जून, २०२४
(२) महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. ४,५ व ६ , दि. ०७ जून, २०२४

**प्रस्तावनाः-**

नगर विकास विभाग, शासन निर्णय दि .१३ फेब्रुवारी २०२३ अन्वये चंद्रपूर महानगरपालिकेच्या १०१० पदांच्या एकत्रित आकृतीबंधास मान्यता देण्यात आली असून, दि .०४ जानेवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये चंद्रपूर महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४ प्रसिद्ध करण्यात आले आहेत. सदर सेवाप्रवेश नियमानुसार महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५ अंतर्गत येणारी पदे, तसेच वर्ग-१ ची इतर सर्व पदे पदोन्नतीने भरतांना, सर्वसाधारण सभेच्या ठरावानंतर त्यास शासनाची पूर्वमंजुरी घेतल्यानंतरच पदोन्नतीने भरता येतील, अशी तरतूद आहे.

२. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५४(१) अन्वये आयुक्त तथा प्रशासक, चंद्रपूर महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली गठीत पदोन्नती तपासणी समितीच्या दि. ३० मे, २०२४ रोजी आयोजित बैठकीमध्ये समितीने पात्र अधिकाऱ्यांस कार्यकारी अभियंता (स्थापत्य) व उप अभियंता (यांत्रिकी / विद्युत) पदांवर पदोन्नती देण्यास शिफारस केली आहे. पदोन्नती समितीने पात्र अधिकाऱ्यांना प्रशासकीय ठराव क्र. ४,५ व ६ , दि. ०७ जून, २०२४ नुसार अनुक्रमे "कार्यकारी अभियंता (स्थापत्य)" , "उप अभियंता (यांत्रिकी)" व"उप अभियंता (विद्युत)" या पदांवर पदोन्नती देण्यास शिफारस केली आहे. त्यानुसार आयुक्त तथा प्रशासक, चंद्रपूर महानगरपालिका यांनी "कार्यकारी अभियंता (स्थापत्य)" , "उप अभियंता (यांत्रिकी)" व "उप अभियंता (विद्युत)" या पदांवर महानगरपालिका आस्थापनेवरील अधिकारी यांना महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५(४) अन्वये कार्योत्तर मान्यता देण्याबाबत संदर्भ क्र. १ नुसार प्रस्ताव सादर केला आहे.

३. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५ अंतर्गत येणाऱ्या “कार्यकारी अभियंता (स्थापत्य)” व “उप अभियंता (यांत्रिकी)” व “उप अभियंता (विद्युत)” या पदांवर संबंधित पात्र अधिकाऱ्यांना तात्पुरती पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

१. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५४(१) अन्वये आयुक्त तथा प्रशासक, चंद्रपूर महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली गठीत पदोन्नती समितीच्या दि. ३० मे, २०२४ रोजी आयोजित बैठकीमध्ये समितीने केलेल्या शिफारशीनुसार, तसेच संदर्भाधीन ठरावांद्वारे प्राप्त मान्यतेनुसार पुढील विवरणपत्रात दर्शविलेल्या अधिकाऱ्यांना पदोन्नती देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे नाव | अधिकारी / कर्मचाऱ्यांचा संवर्ग | पदोन्नतीचे पद |
|---|---|---|---|
| १. | श्री. अनिल मारोती घुमडे | उप अभियंता (स्थापत्य) (५६१००-१७७५००, एस-२०) | कार्यकारी अभियंता (स्थापत्य) (६००००-१९०८००, एस-२२) |
| २. | श्री. विजय जनार्दन बोरीकर | उप अभियंता (स्थापत्य) (५६१००-१७७५००, एस-२०) | कार्यकारी अभियंता (स्थापत्य) (६००००-१९०८००, एस-२२) |
| ३. | श्री. रवींद्र नरहरी कळंबे | सहायक अभियंता (यांत्रिकी) (४१८००-१३२३००, एस-१५) | उप अभियंता (यांत्रिकी) (५६१००-१७७५००, एस-२०) |
| ४. | श्रीम. प्रगती यशवंत भुरे | सहायक अभियंता (विद्युत) (४१८००-१३२३००, एस-१५) | उप अभियंता (विद्युत) (५६१००-१७७५००, एस-२०) |

२. उपरोक्त संर्गातील पदोन्नतीसाठी असलेल्या पदांची बिंदूनामावली तपासून ती सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रमाणित करून घेण्यात आली आहे, याची खात्री करून आयुक्त तथा प्रशासक, चंद्रपूर महानगरपालिका यांनी पदोन्नतीबाबतची पुढील कार्यवाही करावी.

३. प्रस्तावित सर्व अधिकारी यांचा आवश्यकतेनुसारनुसार ५०/५५ चा आढावा घेण्याची दक्षता घ्यावी

४. सदर तात्पुरती पदोन्नती देताना पदोन्नती तपासणी समितीच्या अहवालातील सर्व अटींचे तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या निर्देशांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

५. सदर तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५, दि.०४ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरुद्ध राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाख़ल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधिन असेल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२५०४३०१३३०५१७२२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.04.30 15:27:45 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त तथा प्रशासक, चंद्रपूर महानगरपालिका, चंद्रपूर.
६. निवडनस्ती (नवि-२६).